सन २०२५-२६ मध्ये कृषि उन्नती योजनेंतर्गत ॲग्रिस्टॅक प्रकल्पातील डिजीटल क्रॉप सर्वे हा घटकासाठी रु. ८७३३.९७ लक्ष निधीच्या वार्षिक कृति आराखड्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः ॲग्रिस्टॅ-२०२५/प्र.क्र.१५ (E-९४६४२०) /१०-अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: ११ एप्रिल, २०२५

वाचा -

१) केंद्र शासनाच्या डिजीटल ॲग्रिकल्चर मिशन संदर्भातील मार्गदर्शक सूचना, २०२४
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. ॲग्रिस्टॅ-२०२४/प्र.क्र.१५७/१०-अे, दि. १४.१०.२०२४.
३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. ॲग्रिस्टॅ-२०२४/प्र.क्र.२०२/१०-अे, दि.१३.१२.२०२४
४) राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या ३७ च्या बैठकीचे इतिवृत्त दिनांक २६.०३.२०२५

**प्रस्तावना :-**

राज्यातील कृषि क्षेत्रात डिजीटल सेवांचा वापर करून शासनाच्या विविध योजनांचा जलद गतीने व परिणामकारक लाभ शेतकऱ्यांना देण्याच्या उद्दिष्टाने उपरोक्त वाचा येथील क्र. १ येथे निर्देशित शा. नि. ला अनुसरून राज्यात ॲग्रिस्टॅक योजना राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत राज्यातील सर्व शेतकऱ्यांचा व त्यांच्या शेतांचा आधार संलग्न माहिती संच (फार्मर रजिस्ट्री), शेतकऱ्यांच्या शेतातील हंगामी पिकांचा माहिती संच (क्रॉप सोन रजिस्ट्री) व शेतांचे भू संदर्भिकृत (जिओ रेफरन्स लँड पार्सल) यांचा माहिती संच एकत्रितरित्या तयार करण्यात येत आहेत. त्यामधील हंगामी पिकांचा माहिती संच (क्रॉप सोन रजिस्ट्री) अंतर्गत डिजीटल पीक सर्वेक्षण (डिजीटल क्रॉप सर्वे) राबविण्यात येत आहे.

२. राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या (State Level Sanctioning Committee - SLSC) दिनांक २४.०३.२०२५ रोजी आयोजित बैठकीच्या संदर्भ क्र. ३ येथील इतिवृत्तानुसार सन २०२५-२६ साठी कृषि उन्नती योजनेंतर्गत ॲग्रिस्टॅक प्रकल्पातील डिजीटल क्राप सर्वे या घटकासाठी केंद्र हिस्सा ५२४०.३८ लक्ष आणि राज्य हिस्सा ३४९३.५९ लक्ष निधीच्या वार्षिक कृती आराखड्यास (Annual Action Plan- AAP) मंजूरी दिलेली आहे. त्याअनुषंगाने सदर कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

१. कृषि उन्नती योजनेंतर्गत सन २०२५-२६ साठी ॲग्रिस्टॅक प्रकल्पातील डिजीटल क्रॉप सर्वे हा घटक राबविण्यासाठी केंद्र हिस्सा (६०%) ५२४०.३८ लक्ष आणि राज्य हिस्सा (४०%) ३४९३.५९ लक्ष असा एकूण ८७३३.९७ लक्ष एवढ्या रकमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. त्याबाबतचा बाब निहाय तपशील खालीलप्रमाणे आहे.

रक्कम- लाखांमध्ये

| विषय | एकूण खर्च |
|---|---|
| डिजिटल क्रॉप सर्व्हे<br>(पायाभूत सुविधा, प्रशिक्षण व सुधारणा)<br>• प्रशिक्षण व प्रचार (रु. १९७.५ लक्ष)<br>• सॉफ्टवेअर डेव्हेलोपमेंट आणि अपग्रेडेशन यासाठी (रु. ५२.५० लक्ष)<br>• स्टोरेज इन्फ्रास्टक्चर साठी रु. कोटी (रु. ३००.०० लक्ष) | ५५० |
| हंगामी पिकांचा माहिती संच - सहायकांचे मानधन | ८१८३.९७ |
| एकूण | **८७३३.९७** |
| केंद्र हिस्सा (६०%) | ५२४०.३८ |
| राज्य हिस्सा (४०%) | ३४९३.५९ |

२. कृषि उन्नती योजनेंतर्गत ॲग्रिस्टॅक प्रकल्पातील डिजीटल क्रॉप सर्वे हा घटक राबविण्यासाठी सन सन २०२५-२६ मध्ये होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टकण्यात येईल.

| | **इंग्रजी लेखाशिर्ष** |
|---|---|
| **केंद्र हिस्सा -६०%** | **राज्य हिस्सा-४०%** |
| मागणी क्र. डी-३<br>२४०१, पीक संवर्धन<br>(००)<br>१३१, तांत्रिक प्रगती<br>(०१) डिजीटल पब्लिक इन्फ्रास्ट्रक्चर फॉर ॲग्रिकल्चर<br>(०१)(०१) ॲग्रिस्टॅक/ (डिजीटल पब्लिक इन्फ्रास्ट्रक्चर फॉर ॲग्रिकल्चर) योजना (कें.पु.यो.) केंद्र हिस्सा -६०% (कार्यक्रम)<br>(२४०१ बी ५०८) | मागणी क्र. डी-३<br>२४०१, पीक संवर्धन<br>(००)<br>१३१, तांत्रिक प्रगती<br>(०१) डिजीटल पब्लिक इन्फ्रास्ट्रक्चर फॉर ॲग्रिकल्चर<br>(०१)(०१) ॲग्रिस्टॅक/ (डिजीटल पब्लिक इन्फ्रास्ट्रक्चर फॉर ॲग्रिकल्चर) योजना (कें.पु.यो.) राज्य हिस्सा -४०% (कार्यक्रम)<br>(२४०१ बी ५१७) |

३. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधीन मार्गदर्शक सूचनांनुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्तीनुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत.

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाची रक्कम यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरुवातीला अखर्चित रक्कम व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरुपात रक्कम विचारात घेता येईल व सर्दिग्धता राहणार नाही.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही, याची दक्षता घ्यावी.

६) सदर योजनेकरीता मंजूर झालेला निधी हा ज्या संवर्गासाठी मंजूर केलेला आहे, त्याच संवर्गासाठी खर्च होईल याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर योजनेकरीता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व त्यांच्या कार्यालयातील सहायक संचालक, लेखा-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर निधी खर्च करतांना विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे / टेंडर नियामावली व नियमांचे/ प्रक्रियेचे/वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/P.W.D. म्यॅनुअलच्या अधिन राहून/ C.V.C. तत्वानूसार/CAG च्या निर्देशानुसार / प्रचलित शासन निर्णय/नियम/परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन निर्णय/अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहिल.

६. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग तीन मधील अनुक्र.४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार विभागाच्या स्तरावर निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०४१११७४६४७२४०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJESH HANMANT PADHYE

Digitally signed by RAJESH HANMANT PADHYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=dc153114bd075a6b1e46ab4a44e410949fb23ba3456957504838af4a35a9b324, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A4545183145BB7CEBA2B281345FCFBF965C36542037F7724F53C8F43E1DBA1D4, cn=RAJESH HANMANT PADHYE
Date: 2025.04.11 17:48:15 +05'30'

**(राजेश पाध्ये)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) प्रधान सचिव, (कृषि), मंत्रालय, मुंबई
७) आयुक्त (जमाबंदी) तथा संचालक भूमिअभिलेख महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) सर्व विभागीय कृषी सह संचालक, महाराष्ट्र राज्य.
११) सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१२) सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) सर्व तालुका कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१४) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता)/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.
१५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१६) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
१७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१८) सह संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई-४०० ०३२.
१९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२०) कक्ष अधिकारी (२-अे), कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२१) निवड नस्ती १०-अे.